**अपंग व्यक्तींना शासकीय सेवेतील गट-अ ते गट-ड मधील पदांवर अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ मधील तरतुदीनुसार आरक्षण विहित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्र.: अपंग-१००१/६१/प्र.क्र.३६/२००२/१६-अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १० मे, २००२.

संदर्भ :- १) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र. एसआरव्ही-१०७७/३५७६/१४३३/१६-अ, दि.२३/५/७८
२) शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र. एसआरव्ही-१०९७/प्र.क्र.१२/९७/१६-अ, दि.२/५/९८
३) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र.एसआरव्ही-५१०९८/प्र.क्र.१४/९८/१६-अ, दि.२०/८/९८
४) शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र.एसआरव्ही-१०९८/प्र.क्र.३५/९८/१६-अ,दि.२८/९/९८
५) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र. एसआरव्ही-१०९८/प्र.क्र.१४/९८/१६-अ, दि.९/१०/९८.
६) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र. एसआरव्ही-१०९८/प्र.क्र.३९/९८/१६-अ,दि.१६/६/२००१
७) शासन परि., सा.प्र.वि. क्र. एसआरव्ही-१०९९/प्र.क्र.३७/९९/१६-अ, दि.४/३/२००२.

## शासन परिपत्रक

अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ च्या कलम ३२ व ३३ नुसार, अपंग व्यक्तींसाठी शासकीय व निमशासकीय सेवेतील गट-अ ते गट-ड मधील नियुक्तीकरीता योग्य ठरविलेल्या पदांवर (Identified Posts) सरळ सेवा भरतीमध्ये १)अंध/अल्पदृष्टी (दृष्टीक्षीणता)-१%, २) कर्णबधीर-१%, आणि ३)अस्थिव्यंग किंवा मंदमती-१% असे एकूण ३% आरक्षण ठेवण्याची कार्यपध्दती संदर्भाधीन क्रमांक २ च्या आदेशात विहित करण्यात आली आहे. त्यानुसार राज्य शासनाच्या प्रत्येक मंत्रालयीन विभागाने विभागांतर्गत आणि विभागाच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या विविध शासकीय कार्यालयांमधील गट-अ ते गट-ड मधील प्रत्येक संवर्गातील कामाच्या स्वरूपाचे काळजीपूर्वक परिशीलन करून अपंग व्यक्तींसाठी सरळसेवा भरतीत रिक्त पदांवर ३% आरक्षण विहित करणे आवश्यक आहे. याकरिता उच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार संदर्भाधीन क्रमांक ३ व ५ च्या आदेशानुसार सचिव, सामाजिक न्याय यांच्या अध्यक्षतेखाली तज्ञ व्यक्तींची समिती स्थापन करण्यात आली आहे. अपंग व्यक्तींना शासकीय सेवेत गट-अ ते गट-ड मधील नियुक्तीकरिता योग्य ठरविलेल्या पदांवर सरळसेवेने नियुक्ती देण्यासंदर्भात संदर्भाधीन क्रमांक ७ च्या आदेशानुसार क्रमवार बिंदू नामावली व कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्रमांक ६ च्या आदेशानुसार अपंग व्यक्तींना शासकीय व शासनाच्या अधिपत्याखालील सेवेतील गट-अ ते गट-ड मधील पदांवर सरळसेवेने नियुक्ती देण्यासंदर्भात उच्च वयोमर्यादा सरसकट ४५ वर्षापर्यंत शिथिल करण्यात आली आहे.

२. अपंग व्यक्तींना अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ मधील तरतुदीनुसार सरळसेवा भरतीमध्ये नियुक्ती मिळण्यासाठी, नियुक्तीकरिता योग्य ठरविलेल्या पदांवर (Identified Posts) ३%

आरक्षण विहित करणे आवश्यक आहे. ही कार्यवाही करताना प्रत्येक मंत्रालयीन विभागाने विभागांतर्गत आणि विभागाच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या विविध शासकीय कार्यालये यामधील गट-अ ते गट-ड मधील संवर्ग / पदांनुसार कामाच्या स्वरुपाचे काळजीपूर्वक परिशिलन करुन आरक्षणाचा प्रस्ताव सामाजिक न्याय विभाग आणि सामान्य प्रशासन विभाग यांच्यामार्फत शासनास सादर करणे आवश्यक आहे. तरीही काही मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालये यांनी ही कार्यवाही अद्यापही पूर्ण केलेली नाही, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. म्हणून या परिपत्रकान्वये अशा सूचना देण्यात येत आहेत की, ***ज्या मंत्रालयीन विभागांनी विभागांतर्गत आणि विभागाच्या अधिपत्याखालील कार्यरत असलेल्या विविध कार्यालयातील गट अ ते गट ड मधील संवर्ग / पदांवर अद्यापपर्यंत अपंग व्यक्तींसाठी आरक्षण विहित केलेले नाही, त्या सर्व विभागांनी /कार्यालयांनी ही कार्यवाही दिनांक ३१ मे, २००१ पर्यंत कटाक्षाने पूर्ण करावी.***

३. प्रत्येक मंत्रालयीन विभागांनी/त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांनी वित्त विभागाच्या दि.१० सप्टेंबर,२००१ च्या शासन निर्णयानुसार विभागांतर्गत आणि अधिपत्याखालील कार्यालयातील पदांचा आढावा घेऊन जी पदे भरण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांपैकी अपंग अधिनियमातील तरतूदीनुसार ज्या पदांना अपंग आरक्षण विहित केलेले आहे अशा पदांवर अपंग व्यक्तींच्या नियुक्त्या करणे आवश्यक आहे. मागणीपत्र पाठवताना / पदे भरताना या विभागाच्या दि.४मार्च, २००२ च्या परिपत्रकानुसार कार्यवाही करावी, अशा सूचना सर्व मंत्रालयीन विभाग तसेच त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांना देण्यात येत आहेत.

४. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ च्या कलम ३२ (बी) मधील तरतुद खालीलप्रमाणे आहे,

"at periodical intervals not exceeding three years, review the list of posts identified and up-date the list taking into consideration the developments in technology"

या तरतुदींच्या अनुषंगाने अशा सूचना देण्यात येत आहेत की, अपंग व्यक्ती अधिनियमातील कलम ३२ व ३३ नुसार तसेच या विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ मध्ये विहित केलेल्या परिपत्रकातील कार्यपध्दतीनुसार, सर्व मंत्रालयीन विभागांनी विभागांतर्गत आणि विभागाच्या अधिपत्याखालील कार्यरत असलेल्या विविध कार्यालयातील गट अ ते गट ड मधील अपंग व्यक्तींसाठी योग्य ठरविलेल्या व सूट दिलेल्या पदांच्या यादीचा आढावा अपंग व्यक्ती अधिनियमातील कलम ३२ (बी) मधील तरतुदीनुसार संबंधित आदेशांच्या दिनांकापासून प्रत्येक तीन वर्षांनी घेऊन तंत्रज्ञानात झालेल्या विकासानुसार यादी अद्ययावत करावी.

५. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ च्या कलम २(टी) नुसार अपंग व्यक्तीचे अपंगत्व किमान ४०% असणे आवश्यक आहे. म्हणून सर्व मंत्रालयीन विभागांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, त्यांनी ज्या संवर्ग / पदांकरीता अपंग प्रवर्गासाठी आरक्षण विहित केले आहे त्यामध्ये अपंगत्वाचे प्रमाण **किमान ४०%** दर्शविलेले नसल्यास सुधारित आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

६. याबाबत असेही स्पष्ट करण्यात येते की, ज्या विभागांनी पदांचे / संवर्गांचे सेवा प्रवेश नियम तयार केले असतील त्या मंत्रालयातील विभागांनी या विभागाच्या दि. २ मे, १९९८ च्या आदेशातील कार्यपध्दतीनुसार सामायिक संवर्गाच्या पदांना अपंग व्यक्तींसाठी आरक्षण विहित करण्याबाबतचा प्रस्ताव सामाजिक न्याय विभाग व सामान्य प्रशासन विभाग यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

७. हे आदेश शासकीय / निमशासकीय सेवा, सर्व शासकीय मंडळे / महामंडळे, स्थानिक स्वराज्य संस्था, जिल्हा परिषदा, महानगरपालिका, नगरपालिका आणि शासनाच्या अधिपत्याखालील किंवा शासनाने अनुदान दिलेली मंडळे, अनुदानीत संस्था यांना लागू होतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(द.दा. देशपांडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री,राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
*प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई,
*प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
*प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
*प्रबंधक,लोकआयुक्त व उप लोकआयुक्त,मुंबई,
*सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
*सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई,
*सचिव,राज्य निवडणूक आयोग,मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व महापालिकांचे आयुक्त,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मुख्याधिकारी, नगर परिषदा/नगरपालिका,
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई
अवर सचिव, सामाजिक न्याय विभाग (सुधार-१), मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
आयुक्त, अपंग कल्याण, ३, चर्च रोड, पुणे.
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती.
* पत्राने.

* * * * *

H-325(5000-5-02)2.

C:\Shrikant\Handicap letter/133